**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास सवलतींच्या मूल्यांच्या प्रतिपूर्तीपोटी रु.५८८,२३,८७,४०३/- रोखीने प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी-०५१८/प्र.क्र.३२७/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि १, दिनांक २० जुन, २०००.
२) शासन निर्णय क्र.एसटीसी ३४०१/सीआर-४२/भाग-१/परि १, दिनांक ५ डिसेंबर, २००५.
३) शासन निर्णय क्र. एसटीसी ३४०५/सीआर-५१५/परि १, दिनांक २६ जुलै, २००६.
४) शासन निर्णय क्र. एसटीसी ०११३/सीआर-१०३/परि १, दिनांक १० फेब्रुवारी, २०१४.
५) शासन निर्णय क्र. एसटीसी ०८१५/प्र.क्र.५५०/परि-१, दिनांक २५ फेब्रुवारी, २०१६
६) शासन निर्णय क्र. एसटीसी ०७१८/प्र.क्र.४१४/परि-१, दिनांक २९ सप्टेंबर, २०१८
७) शासन निर्णय क्र. एसटीसी ०५१८/प्र.क्र.३२७/परि-१, दिनांक ०२ नोव्हेंबर, २०१८
८) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प.म. यांचे पत्र क्र.राप/लेखा/नोंदणी/ सवलत/ ३१२३, दिनांक २७.१२.२०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाद्वारा राज्य शासनाने वेळोवळी दिलेल्या आदेशानुसार विविध प्रवासी वर्गाला प्रवासी भाडयात सवलती देण्यात येतात. सदर खर्चाची प्रतिपूर्ती दि.१.०४.२०१६ पासून गृह (परिवहन) विभागाद्वारे करण्याबाबत संदर्भाधिन क्र.५ येथील दि.२५/२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे.

त्याप्रमाणे सन २०१८-१९ मध्ये संदर्भाधिन क्र.६ येथील शासन निर्णयान्वये रु.१०७,८०,८७,७३६/- प्रवासी कराचे सवलत मुल्याच्या प्रतिपुतीपोटी पुस्तकी समायोजन करण्यात आले आहे. तसेच, संदर्भाधिन क्र.७ येथील शासन निर्णयान्वये रु.६०७,७४,७२,३९८/- रोखीने महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास वितरीत करण्यात आला आहे. आता महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने संदर्भाधिन क्र.८ येथील पत्रान्वये प्रवास सवलत मुल्याची रक्कम रु.५८८,२३,८७,४०३/- रोखीने वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास विविध प्रवास सवलत मूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी द्यावयाच्या रक्कमेपैकी रु. ५८८,२३,८७,४०३/- (अक्षरी रुपये पाचशे अठ्ठयाऐंशी कोटी तेवीस लाख सत्त्याऐंशी हजार चारशे तीन फक्त) रक्कम सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१८-१९ च्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक "बी-३, लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, ००, ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त, (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य), (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी खर्ची टाकण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २३/२०१९/व्यय-८, दि.१५.०२.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९०२२०१६०५५५०१२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Meghana Gaurav Shinde
Date: 2019.03.01 11:54:05 +05'30'

**(मेघना गौरव शिंदे)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
२.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
३.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई

४.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
७.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
८.वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४) मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती/परि १.